कामगार आयुक्त, मुंबई यांचे कार्यालय
अस्थायी पदांना दिनांक १.११.२००१ ते
३१.१२.२००१ पर्यन्त मुदतवाढ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय, क्र.काआआ-१२०१/(प्र.क्र.२०)/कामगार-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २९.११.२००१

**पहा:-** १) शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र.काआआ-१२००/(प्र.क्र.२०)/काम-८, दि.३.९.२००१

२) कामगार आयुक्त, मुंबई यांचे पत्र क्र.आस्था-१३००/अस्थायी /३०५७ /कार्यासन -२, दि. ८.१०.२००१.

**शासन निर्णय:-**

कामगार आयुक्त, मुंबई यांचे आस्थापनेवरील या निर्णयासोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ क्रमांक ५ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयानुसार निर्माण केलेली आणि शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र.काआआ-१२००/(प्र.क्र.२०)/कामगार-८, दिनांक ३.३.२००१ अन्वये दिनांक ३१.१०.२००१ पर्यन्त मुदतवाढ देण्यात आलेल्या सोबतच्या परिशिष्टातील ८२ अस्थायी राजपत्रित व अराजपत्रित पदांना दि.१.११.२००१ ते दिनांक ३१.१२.२००१ पर्यन्त मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्यात येत आहे. ही मंजूरी ज्या प्रकरणी शासनाने काही ठराविक कालमर्यादेपर्यन्तच मुदतवाढ देऊन, पदे नष्ट करण्याचे विनिर्दिष्ट आदेश दिलेले आहेत किंवा तसे सूचित केलेले आहेत अशी पदे आणि सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त असलेली पदे वगळून देण्यात येत आहे.

२. संबंधित पदधारक नियमानुसार मिळणारा महागाई भत्ता व इतर भत्ते मिळण्यास पात्र आहेत.

३. याबाबतीत होणारा सर्व खर्च परिशिष्टातील रकाना क्रमांक ४ मध्ये त्या पदांच्या समोर दर्शविलेल्या अर्थशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि त्याखाली २००१-२००२ या वर्षातील मंजूर अनुदानातून भागाविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ प्रकरण क्र.७७६/२००१/व्यय-१६, दिनांक २८.११.२००१ अन्वये मिळविलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(का.तु.सातकर)
शासनाचे अवर सचिव.

प्रति:-

कामगार आयुक्त, मुंबई (५ प्रती)
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/ व्यय-१६)
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग (उद्योग-१७)
निवड नस्ती.

कामगार आयुक्त, मुंबई यांचे कार्यालय
अस्थायी पदांना दिनांक १.९.९९ ते
३१.१.२००० पर्यन्त मुदतवाढ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शुध्दीपत्रक, क्र.काआआ-१२९९/(१०९४२)/कामगार-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांकः-२१.१०.१९९९

**शुध्दीपत्रकः-**

शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र.काआआ-१२९९/(१०९४२)/कामगार-८, दि.२८.९.१९९९ सोबतच्या परिशिष्टामधील पृष्ठ ६ स्तंभ ४ मध्ये नमूद केलेले लेखाशीर्ष " २२३०-कामगार व सेवायोजन (०१) कामगार(१०१) औद्योगिक व सेवायोजन (०१) कामगार चौकशी समिती" या मजकूराऐवजी खाली नमूद केलेला मजकूर वाचण्यात यावाः-

" २२३०-कामगार व सेवायोजन (०१) कामगार (१०१) औद्योगिक संबंध (१०१) (४) विशेष चौकशी समित्या ".

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(का.तु.सातकर)
शासनाचे अवर सचिव .

प्रतिः-

कामगार आयुक्त, मुंबई(५ प्रती)
महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/ व्यय-१६)
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग (उद्योग-१७) /निवड नस्ती.

GR-20020416144927000-1103